**होमगार्डना प्रशस्तिपत्रक देण्याबाबत.**

महाराष्ट्र शासन
गृह विभाग
शासन निर्णय क्र. एचजीएस-२००३ / सीआर-६/विशा-८,
मंत्रालय,मुंबई-४०० ०३२, दिनांक : १७ जानेवारी,२००३

**शासन निर्णय :-**

होमगार्ड ही मानसेवी संघटना असून पोलीस दलाला अंतर्गत सुरक्षा राखण्याच्या कामी "सहाय्यकारी दल" म्हणून काम करणे हे होमगार्ड संघटनेचे प्रमुख कर्तव्य आहे. तसेच, बंद,संप, दंगली इ. प्रसंगी बंदोबस्ताकरिता होमगार्डसच्या सेवा वापरण्यात येतात. होमगार्ड संघटना सक्षम करुन त्यास बळकटी देणे तसेच जास्तीत-जास्त जनता आकर्षित होऊन भरती होईल या दृष्टीने काही उत्तेजनार्थ उपाययोजना करणे आवश्यक असल्याची गरज भासत होती. त्यासाठी उत्तेजनार्थ उपाययोजना म्हणून पोलीस महासंचालक यांच्याप्रमाणे महासमादेशक, होमगार्ड यांच्याकडून होमगार्डसना प्रशस्तिपत्रक देण्याचा शासनाने निर्णय घेतला आहे. खालील बाबतीत उत्तम कामगिरीबाबत प्रति वर्षी जास्तीत-जास्त १० मानसेवी अधिकारी (होमगार्डसह) यांना महासमादेशक, होमगार्ड यांच्याकडून दर वर्षी १ मे रोजी प्रशस्तिपत्रक प्रदान करण्यात यावे. यासाठी खालील निकष विहीत करण्यात येत आहेत.

**(१) लगतपूर्व ३ वर्षांच्या कालावधीत ९० % पेक्षा अधिक काळ कर्तव्यावर हजर राहणारे मानसेवी अधिकारी (होमगार्डसह).**
**(२) उत्तम सेवा बजावणारे.**
**(३) प्रशंसनीय स्वरुपाचे व अत्युत्तम काम केल्याबाबत.**

२. जिल्हा समादेशक, होमगार्ड यांनी त्यांच्या जिल्ह्यातील वरील निकष पूर्ण करणाऱ्या मानसेवी अधिकाऱ्यांची नावे महासमादेशक, होमगार्ड,मुंबई यांना दि. ३१ जानेवारी पूर्वी पाठविण्याची व्यवस्था करावी. महासमादेशक, होमगार्ड यांच्या कार्यालयामार्फत छाननी होऊन वर उल्लेख केल्याप्रमाणे महासमादेशक, होमगार्ड हे १ मे रोजी प्रशस्तिपत्रक प्रदान करतील.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

( ना. रा. शेरे)
**उपसचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत:-

(१) महासमादेशक, होमगार्ड, महाराष्ट्र राज्य,मुंबई
(२) समादेशक, प्रशिक्षण संस्था (सर्व)
(३) समादेशक, मध्यवर्ती प्रशिक्षण संस्था,घाटकोपर,मुंबई
(४) जिल्हा समादेशक, होमगार्ड (सर्व)
(५) निवड नस्ती विशा-८